**पदस्थापनेत अंशत: बदल करण्याबाबत.**
**श्रीमती राऊत राजश्री दिगंबरराव, सहयोगी प्राध्यापक, अणुविद्युत व दूरसंदेशवहन अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षकीय सेवा (गट-अ)**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः न्यायाप्र-२०१७/प्र.क्र.(२४५/१७)/तांशि-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक -: २८ डिसेंबर, २०१८

**संदर्भ** :- उच्च व तंत्र शिक्षण विभाग,समक्रमांकाचा शासन निर्णय दि. २२.११.२०१८

**शासन निर्णय -:**

मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे दाखल करण्यात आलेल्या मूळ अर्ज क्र. ७७०/२०१५ मध्ये प्राप्त आदेशानुसार व महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने केलेल्या शिफारशीनुसार सहयोगी प्राध्यापक, अणुविद्युत व दूरसंदेशवहन अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षकसेवा ( गट-अ ) या पदावर श्रीमती राऊत राजश्री दिगंबरराव यांची संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर येथे नियुक्ती करण्यात आली आहे. त्यांच्या सदर पदस्थापनेच्या ठिकाणात अंशत: बदल करण्यात येत असून, सुधारीत पदस्थापनेचे ठिकाण खालील तक्त्यातील स्तंभ - ५ येथे दर्शविल्याप्रमाणे राहील.

| आयोग पुरस्कृत उमेदवाराचे नांव | वर्गवारी | नियमानुसार वाटप करण्यात आलेला महसुली विभाग | पूर्वीचे पदस्थापनेचे ठिकाण | सुधारीत पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| श्रीमती राऊत राजश्री दिगंबरराव | इ.मा.व | नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, नागपूर |

२. श्रीमती राऊत यांना संदर्भाधीन शासन निर्णयातील सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

३. सदर आदेशाच्या दिनांकापासून संबधित उमेदवाराने नियुक्तीच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत हजर व्हावे व त्याबाबतचा अहवाल संबधित संस्था प्रमुखाकडे सादर करावा. संस्था प्रमुखांनी तो अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास सादर करावा. सदर पदावर रुजू होण्यास मुदतवाढ देण्याबाबतच्या कोणत्याही विनंतीची दखल घेतली जाणार नाही. तसेच विहीत मुदतीत सदर पदावर रुजू न झाल्यास नियुक्ती रद्द करण्यात येईल.

४. सदर आदेश सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२८१२४११७०३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2018.12.28 12:52:06 +05'30'

**( समीर ढेरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

श्रीमती राऊत राजश्री दिगंबरराव, २७, सुमन कॅसल, फ्लॅट नं. ३०२, हिंदुस्थान कॉलनी, अमरावती रोड, नागपूर-४४० ०३३ (नोंदणीकृत देय डाकेने)

**प्रत:-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) संचालक, तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
५) सह संचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, नागपूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
६) प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर/नागपूर (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत ) - वरील उमेदवारास रुजू करुन घेताना त्याच्या शैक्षणिक तसेच इतर मूळ प्रमाणपत्रांची तपासणी करुन ते पात्र असल्याची संस्थाप्रमुखांनी स्वत: खात्री करावी व सदर उमेदवारांना हजर करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल संचालक, तंत्रशिक्षण यांच्यामार्फत शासनास तात्काळ सादर करावा.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
८) जिल्हा कोषागार आधिकारी, चंद्रपूर / नागपूर.
९) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१०) निवड नस्ती / तांशि-१.